होमगार्डना टेरिकॉटचा गणवेश संच
पुरविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग [विशेष]
शासन निर्णय क्रमांक एचजीएस २४८८/९८७/सीआर १२०/विशा-८,
मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक ११ ऑगस्ट, १९९५

वाचा :- महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ४६०१/भांडार/मत दि. २ जुलै, १९९२.

२] शासन पत्र, गृहविभाग क्र. एमआयएस १०९५/अनुप/९५-९६ बोयुडी-१, दि. १२ जुलै, १९९५.

३] शासन पत्र, गृहविभाग क्र. बीजीटी १०९५/नवीन बाबी भाग-१ व भाग-२/९५-९६/वियुडी-१, दिनांक ३१ जुलै, १९९५.

शासन निर्णय :- केंद्र शासनाने होमगार्डसना चार वर्षातून एक संच टेरीकॉट व वर्षातून १ संच सुती गणवेश देण्याबाबतचे निदेश दिलेले आहेत. त्यानुसार महाराष्ट्र शासनाने होमगार्डना सुती गणवेशाऐवजी टेरीकॉटचा गणवेश देण्याचा निर्णय घेतला आहे. तथापि एकाचवेळी सर्व होमगार्डना टेरीकॉट गणवेश पुरविणे अशक्य असल्याने तो टप्याटप्याने व अर्थ संकल्पात केलेल्या तरतूदीच्या मर्यादेच्या अनुषंगाने देण्याचे ठरविले आहे. त्यानुसार एकूण चार टप्प्यात पुरुष व महिला होमगार्डसना गणवेश पुरविण्यास व त्यातील पहिला टप्पा येत्या सन १९९५-९६ या वित्तीय वर्षात पूर्ण करण्यास शासन या आदेशान्वये मंजुरी देत आहे. मात्र असे स्पष्ट करण्यात येते की, टेरीकॉटचा गणवेश मिळेपर्यन्त उर्वरीत होमगार्डसना सुती गणवेश देण्यात येणार आहेत.

२. होमगार्डना टेरिकॉट गणवेश पुरविण्याच्या उपरोक्त पहिल्या टप्प्याच्या रु. २८,४६,०००/- [रु. अठ्ठावीस लाख, सेहेचाळीस हजार फक्त] च्या आर्थिक आवर्ती खर्चास, शासन या आदेशान्वये मंजुरी देत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "२०७०-इतर प्रशासकीय सेवा [१०७] होमगार्ड" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन १९९५-९६ या आर्थिक वर्षासाठी नवीन बाब भाग-१ अन्वये मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर ५३६/९४ व्यय आठ दिनांक १ सप्टेंबर १९९४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-

[ दि. वि. एकबोटे ]

शासनाचे उप सचिव, महाराष्ट्र शासन,

गृह विभाग.

प्रति,

महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई

महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र-१, मुंबई, महाराष्ट्र-२, नागपूर.

महालेखापाल [लेखा परिक्षा] महाराष्ट्र-१, मुंबई, महाराष्ट्र-२, नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

वित्त विभाग, व्यय-८/बोपुडो-१०.

गृहविभाग, बोपुडो-१,

निवड नस्ती.